**गट “क” व “ड” (वर्ग ३ व ४) मधील कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठितता घालविण्यासंबंधी योजना**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक वेतन २०००/प्र.क्र.१०/सेवा-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १७ मे २००३

**वाचा.—**शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेतन-२०००/प्र.क्र.१०/ सेवा-३, दिनांक ३ ऑगस्ट २००१.

**शासन निर्णय**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ८ जून १९९५ अन्वये गट “क” व “ड” (वर्ग ३ व ४) मधील कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठितता घालविण्यासंबंधीची योजना दिनांक १ ऑक्टोबर १९९४ पासून अंमलात आली आहे. या योजनेअंतर्गत पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणी अनुज्ञेय असून ज्या पदांना पदोन्नतीचे पद उपलब्ध नाही अशा पदधारकांना तसेच एकाकी पदावरील कर्मचा-यांना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे वरीष्ठ वेतनश्रेणी अनुज्ञेय आहे. शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक १० डिसेंबर १९९८ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणी दिनांक १ जानेवारी १९९६ पासून सुधारित करण्यात आल्या आहेत. या सुधारित वेतनश्रेणीच्या अनुषंगाने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ८ जून १९९५ सोबतच्या परिशिष्टातील वेतनश्रेणी ,त्याअनुरुप सुधारण्याबाबत संदर्भाधीन दिनांक ३ ऑगस्ट २००१ च्या शासन निर्णयान्वये स्वयंस्पष्ट सुधारित आदेश अनुज्ञेय वेतनश्रेणींसह निर्गमित केले आहेत.

**२.** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ८ जून १९९५ सोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे ज्या कर्मचाऱ्यांना वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे त्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑगस्ट २००१ सोबतच्या परिशिष्ट-एक मधील समकक्ष वेतनश्रेणी अनुज्ञेय असून ज्या कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी १९९६ रोजी व त्यानंतर कालबध्द पदोन्नतीचा लाभ अनुज्ञेय आहे त्यांना परिशिष्ट-दोन मधील समकक्ष वेतनश्रेणी अनुज्ञेय आहे.

दिनांक १ जानेवारी १९९६ पूर्वी ज्या कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ देण्यात आला आहे त्यांना दिनांक १ जानेवारी १९९६ पासून, सदर दिनांक ३ ऑगस्ट २००१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-दोन प्रमाणे सुधारित वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल वा कसे यांसदर्भात विविध कार्यालयांकडून विचारणा करण्यात येत आहे. वाहनचालक संघटनेकडूनही याबाबत निवेदने प्राप्त झाली आहेत. तसेच याबाबत आणखीही काही मुद्दे उपस्थित झाले आहेत. याबाबत खुलासा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे खुलासा करण्यात येत आहे.

**२.१** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ८ जून १९९५ मधील आदेश ज्या कर्मचाऱ्यांना लागू आहेत त्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑगस्ट २००१ मधील आदेश आपोआप लागू होतील.

**२.२** दिनांक १ ऑक्टोबर १९९४ ते दिनांक ३१ डिसेंबर १९९५ या कालावधीत ज्या कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे त्यांना दिनांक ८ जून १९९५ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टानुसार देण्यात आलेली वरिष्ठ वेतनश्रेणी विचारात घेऊन, **दिनांक ३ ऑगस्ट २००१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-एक मधील समकक्ष सुधारित वेतनश्रेणी** अनुज्ञेय होते. अशा कर्मचाऱ्यांना परिशिष्ट-एक मधील समकक्ष सुधारित वेतनश्रेणीच्या आधारे पुन्हा दिनांक १ जानेवारी १९९६ पासून परिशिष्ट-दोन मधील वेतनश्रेणी अनुज्ञेय होणार नाही.

**२.३** दिनांक १ जानेवारी १९९६ रोजी वा त्यानंतर ज्या कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा लाभ अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे, अशा कर्मचा-यांना **त्यांनी धारण केलेल्या पदाची दिनांक १ जानेवारी १९९६ ची वेतनश्रेणी विचारात घेऊन केवळ परिशिष्ट-दोन मध्ये नमूद केलेली वरिष्ठ वेतनश्रेणी** अनुज्ञेय होईल.

**२.४** शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑगस्ट २००१ च्या परिच्छेद २ (३) मधील आदेश हे ज्या पदांना राज्य वेतन सुधारणा समितीने असुधारित वेतनश्रेणीसाठी समकक्ष सुधारित वेतनश्रेणीहून वरची वेतनश्रेणी विहित केली आहे त्या **भौतिकोपचार तज्ज्ञ, व्यवसायोपचार तज्ज्ञ व वैद्यकीय समाजसेवक या पदांच्या बाबतीतच लागू होतात.** त्यामुळे या परिच्छेदातील आदेशानुसार वरील पदांव्यतिरिक्त अन्य पदांना वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूर केली असल्यास ती योग्य नसल्याने अशा कर्मचाऱ्यांना यथास्थिती परिशिष्ट-एक किंवा दोन मध्ये नमूद केलेली वेतनश्रेणी मंजूर करणे आवश्यक राहील.

**२.५** शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ ऑगस्ट २००१ मधील आदेशानुसार कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीअंतर्गत सुधारित वेतनश्रेणी अनुज्ञेय करताना खालीलप्रमाणे स्पष्टीकरण विचारात घ्यावे.

(अ) वाहनचालकांना पदोन्नतीचे पद उपलब्ध नसल्याने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग. दिनांक ८ जून १९९५ सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेली रु. १२००-२०४० ही वरीष्ठ वेतनश्रेणी अनुज्ञेय होते. या योजनेचा लाभ संपूर्ण सेवेत केवळ एकदाच मंजूर करावयाचा असल्याने दिनांक ३१ डिसेंबर १९९५ पर्यंत कालबध्द पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या वाहनचालकांना दिनांक १ जानेवारी १९९६ पासून, दिनांक ३ ऑगस्ट २००१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-एक मध्ये नमूद केलेली रु. ४०००-६००० ही समकक्ष सुधारित वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल. **या कर्मचाऱ्यांना पुन्हा परिशिष्ट-दोन मध्ये नमूद केलेली रु.४५००-७००० ही वरिष्ठ वेतनश्रेणी देय होणार नाही.**

(ब) दिनांक १ जानेवारी १९९६ पासून वाहनचालकांना रु. ३०५०-४५९० ही सुधारित वेतनश्रेणी विहित केली असल्याने, दिनांक १ जानेवारी १९९६ रोजी वा त्यानंतर कालबध्द पदोन्नतीस पात्र होणाऱ्यां वाहनचालकांना, दिनांक ३ ऑगस्ट २००१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-दोन मध्ये नमूद केल्याप्रमाणे रु. ४०००-६००० ही वेतनश्रेणी अनुज्ञेय होते. **त्यांना रु.४५००-७००० ही वरिष्ठ वेतनश्रेणी देय होणार नाही.**

**२.६** शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २० जुलै २००१ अन्वये कालबध्द पदोन्नतीची योजना बंद करून त्याऐवजी सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना दिनांक १ ऑगस्ट २००१ पासून लागू करण्यात आली आहे. याचाच अर्थ दिनांक ३१ जुलै २००१ पर्यंत पुर्वीची कालबध्द पदोन्नतीची योजना अस्तित्वात असून दिनांक १ ऑगस्ट २००१ पासून सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना अंमलात आली आहे. त्यामुळे **दिनांक ३१ जुलै २००१ पर्यंत कालबध्द पदोन्नतीसाठी पात्र होणाऱ्या कर्मचा-यांच्या बाबतीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ८ जून १९९५ नुसार व त्यानंतरच्या स्पष्टीकरणात्मक आदेशानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील. दिनांक १ ऑगस्ट २००१ रोजी व त्यानंतर सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणीस पात्र होणाऱ्या कर्मचाऱ्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २० जुलै २००१ मधील आदेशानुसार वरिष्ठ वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल.**

**उदा. :**—वाहनचालकांची दिनांक १ जानेवारी १९९६ ची वेतनश्रेणी रु. ३०५०—४५९० असल्याने दिनांक ३१ जुलै २००१ पर्यंत कालबध्द पदोन्नतीस पात्र होणाऱ्या वाहनचालकांना दिनांक १ जानेवारी १९९६ पासून रु. ४०००-६००० ही वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल. तसेच दिनांक १ ऑगस्ट २००१ पासून सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणीस पात्र होणाऱ्या वाहनचालकांना, दिनांक २० जुलै २००१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठ-एक नुसार रु. ३२००-४९००. ही वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल.

३. कालबध्द पदोन्नती सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत वरीलप्रमाणे वरिष्ठ वेतनश्रेणी अनुज्ञेय होत असल्याने, कर्मचाऱ्यांना मंजूर केलेल्या वेतनश्रेणीची पडताळणी कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख यांनी करून अनुज्ञेय वेतनश्रेणीपेक्षा वरची वेतनश्रेणी देण्यात आल्याचे निदर्शनास आल्यास संबंधितांना उचित वेतनश्रेणी मंजूर करण्यात यावी. तसेच झालेल्या अतिप्रदानाची वसुली योग्य हप्त्यात करण्यात यावी. याबाबत खात्री करून घेण्याची जबाबदारी सर्व कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख यांची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**शु. श. कारेकर,**
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) - १ महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) - २ महाराष्ट्र, नागपुर,
महालेखापाल (लेखा परीक्षा ) - १ महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल ( लेखा परीक्षा ) - २ महाराष्ट्र, नागपुर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख, प्रादेशिक प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, ( मुळ शाखा ), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, ( अपील शाखा ), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनीयर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, ( व्यय विभाग )
खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक लेखा निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई / पुणे / नागपुर / औरंगाबाद /नाशिक /अमरावती.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, सेवा ३, वित्त विभाग.

---
* पत्राने.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई